कनिष्ट स्तर गट-अ आणि गट-ब च्या राजपत्रित अधिकाऱ्यांचे वयाच्या ५०/५५ वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा कालावधीच्या पुढे शासन सेवेत राहाण्याची पात्रता अजमाविण्यासाठी करावयाचे पुनर्विलोकनाबाबत तसेच पुनर्विलोकनाअंती मुदतपूर्व सेवानिवृत्त केलेल्या अधिकारी/कर्मचारी यांनी सादर केलेल्या अभिवेदनाबाबत निर्णय घेण्यासाठी "अभिवेदन समिती" गठित करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्यांक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : समिती-४३१७/प्र.क्र.३१/का-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २७ फेब्रुवारी, २०१७

वाचा :- १) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्र.विपुस-१०९९/प्र.क्र.५८/९९/१५, दि.१६.०९.१९९९
२) अल्पसंख्याक विकास विभागाचा शासन निर्णय क्रमांक: समिती-४३१७/प्र.क्र.३१/का-१, दि. २७.०२.२०१७

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम १९८२ च्या नियम १० (४) व ६५ अनुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम/संशयास्पद सचोटीच्या अधिकारी/कर्मचारी यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा कालावधीच्या पुढे सेवा चालू ठेवण्यासाठी अल्पसंख्याक विकास विभागाच्या संदर्भ क्र.२ मधील शासन निर्णय क्रमांक: समिती-४३१७/प्र.क्र.३१/का-१, दि. २७ फेब्रुवारी, २०१७ अन्वये पुनर्विलोकन समिती स्थापन करण्यात आली आहे. सदर समितीने पुनर्विलोकनाअंती निर्णय घेवून एखाद्या अधिकारी/कर्मचारी यास शासन सेवेतून मुदतपुर्व सेवानिवृत्त करण्याची नोटीस दिल्यास त्या नोटीस विरुध्द संबंधित अधिकारी/कर्मचारी यांनी अभिवेदन सादर केल्यास अशा कर्मचाऱ्यांच्या बाबतीत निर्णय घेण्यासाठी, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.विपुस-१०९९/प्र.क्र.५८/९९/१५, दि. १६.०९.१९९९ अन्वये संबधित अधिकारी/कर्मचारी यांच्या अभिवेदनावरील कार्यवाहीसंबंधीचे पूर्ण अधिकार मंत्रालयीन विभागांना प्रस्तुत शासन निर्णयान्वये देण्यात आले आहेत. त्यानुषंगाने अभिवेदनावर यथायोग्य कार्यवाही करुन निर्णय घेण्यासाठी "**अभिवेदन समिती**" गठित करण्याची बाब विभागाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

विभागातील कनिष्ट स्तर गट-अ आणि गट-ब अधिकाऱ्यांच्या बाबतीत पुढीलप्रमाणे "**अभिवेदन समिती**" स्थापन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) विभागाचे सचिव | -- | अध्यक्ष |
| २) विभागातील उप सचिव | -- | सदस्य |
| ३) विभागातील अवर सचिव | -- | सदस्य सचिव |

(अ.क्र.२ आणि क्र.३ मधील अधिकारी हे विभागातील पुनर्विलोकन समितीमधील अधिकाऱ्यां व्यतिरिक्त असतील.)

२. सदरहू अभिवेदन समिती शासनाने वेळोवेळी दिलेल्या आदेशांमधील कार्यपध्दतीचा अवलंब करुन त्याप्रमाणे निर्णय घेईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२२७१२२३४७९९१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार नावाने,

Suhas Madhav Mamdapurkar

Digitally signed by Suhas Madhav Mamdapurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minority Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=15e9cd7730234dc2963eb61397dd04240c15d02a5a148c43a83593ac725fd19c, serialNumber=f1b00e7181536eedd7b08803397fed3a96870ca795c4d9384b72f43a5a066d99, cn=Suhas Madhav Mamdapurkar
Date: 2017.02.27 12:25:33 +05'30'

**( सुहास ममदापूरकर )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव,यांचे स्वीय सहायक, अल्पसंख्यांक विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
२. सर्व उप सचिव/अवर सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग,मंत्रालय, मुंबई
३. व्यवस्थापकीय संचालक,मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई.
४. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोग, मुंबई.
५. कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र राज्य हज समिती,मुंबई
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद.
७. पीठासीन अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद.
८. अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दु साहित्य अकादमी, मुंबई
९. सर्व कक्ष अधिकारी, अल्पसंख्याक विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती/का.१.